**नवी मुंबई महानगरपालिका परिवहन समितीचा नवीन २५० स्टेनलेस स्टीलचे बस निवारा थांबे बी.ओ.टी. (बांधा, वापरा, हस्तांतरीत करा) तत्वावर बांधणे व जाहिरातीचे हक्क देणेसंदर्भातील दि.३१.०५.२०१९ रोजीचा ठराव क्र. ११९, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम- ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- नमुंम-१२१९/प्र.क्र.६४/नवि-२८**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक:- २० जानेवारी, २०२०.**

**संदर्भ**:-१) नवी मुंबई महानगरपालिका परिवहन समिती ठराव क्र. ११९, दि. ३१.०५.२०१९.
२) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/परि/शेल्टर/५०/२०१९, दि. ०४.०६.२०१९.
३) नगर विकास विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि. १३.०९.२०१९
४) महापौर, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/ महापौर कार्यालय/ २०१९/ ४२८१, दि. ०९.१०.२०१९.
५) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/परि/शेल्टर/१२४/२०१९, दि. ०२.१२.२०१९.

**प्रस्तावना:-**

नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाच्या १८३ बस शेल्टरचा सन २००७ ते २०१८ या कालावधीसाठी दिलेला कंत्राट संपलेला असून, सदर शेल्टर्स जीर्ण होऊन मोडकळीस आले आहेत. सद्यस्थितीत परिवहन उपक्रमास यापासून महिन्याला साधारणत: रू. १.५ लाख उत्पन्न मिळते. सदर उत्पन्नात वाढ व्हावी यासाठी नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाने **नवीन २५० स्टेनलेस स्टीलचे बस निवारा थांबे बी.ओ.टी. (बांधा, वापरा, हस्तांतरीत करा) तत्वावर बांधणे व जाहिरातीचे हक्क देणे याबाबतची निविदा प्रक्रिया राबविली. सदर निविदा प्रक्रियेमध्ये** मे. प्रोॲक्टीव्ह इन ॲन्ड आऊट ॲडव्हरटायजिंग प्रा. लि. या उच्चतम दर (H१) सादर करणाऱ्या निविदाकाराची निविदा अंतिम करून महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-७३ (क) व कलम-७५ नुसार परिवहन समितीस प्रस्ताव मान्यतेस्तव सादर केला. महानगरपालिकेच्या परिवहन समितीने दि. ३१.०५.२०१९ रोजी ठराव क्र. ११९ अन्वये सदर प्रस्ताव बहुमताने नामंजूर केला व संबंधितांना फेरनिविदा प्रक्रिया राबविण्याच्या सूचना दिल्या.

२. सदर ठराव हा परिवहन उपक्रमाच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (३) अन्वये विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी संदर्भीय दि. ४.०६.२०१९ च्या पत्रान्वये केली आहे. नवी मुंबई महानगरपालिकेच्या परिवहन समितीने दि. ३१.०५.२०१९ रोजी पारीत केलेला ठराव क्र. ११९ हा महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमाच्या आर्थिक हिता विरूध्द असल्याचे राज्य शासनाचे मत झाल्याने शासनाच्या दि. १३.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने मा. महापौर, नवी मुंबई महानगरपालिका तसेच आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे निवेदन प्राप्त झाले आहे. मा. महापौर,

नवी मुंबई महानगरपालिका यांनी त्यांच्या निवेदनात परिवहन समितीने रद्द केलेला प्रस्ताव योग्य असल्याचे नमूद केले आहे.

आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी त्यांच्या अभिप्रायात त्यांचे दि. ०४.०६.२०१९ चे म्हणणे कायम ठेवले आहे. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी त्यांच्या दि. ४.०६.२०१९ च्या पत्रात असे नमूद केले आहे की,

२.१) परिवहन समितीचा ठराव क्र. ११९ च्या अनुषंगाने फेरनिविदा प्रक्रिया राबविल्यास ती वेळखाऊ ठरेल तसेच त्यामध्ये खुप कालापव्यय होणार आहे. यापूर्वीच्या अनुभवावरून निविदेस लगेचच प्रतिसाद मिळण्याची शक्यता कमी आहे.

२.२) फेरनिविदा प्रक्रिया राबविल्यास सद्याच्या प्राप्त दरापेक्षा अधिक दर प्राप्त होईल याची खात्री देता येणार नाही.

२.३) नवीन निविदा अंतिम होत नसल्यामुळे कार्यरत कंत्राटदारास मुदतवाढ देणे अपरिहार्य होत असल्याने पुर्वीच्या अत्यल्प दराने महसूल प्राप्त होत आहे. यामुळे परिवहन **उपक्रमाचे** आर्थिक नुकसान होत आहे.

२.४) सद्या अस्तित्वात असलेले बस शेल्टर्स हे १० ते १२ वर्षापूर्वी बांधण्यात आलेले असून ते जीर्ण होऊन मोडकळीस आलेले आहेत. फेरनिविदा प्रक्रियेस विलंब झाल्यास बस प्रवाश्यांची गैरसोय होऊ शकते.

२.५) नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रम **मासिक ५ कोटी रूपये तोट्यात चालत असून,** नवीन निविदा मंजूर झाल्यास महसूलात वाढ होऊन उपक्रमाचा तोटा काही अंशी कमी होईल. यास्तव प्रस्तुत निविदा प्रक्रियेस मान्यता मिळणे गरजेचे आहे.

२.६) **परिवहन उपक्रमाने सदर निविदा प्रक्रियेच्या अनुषंगाने १५ वर्षे कालावधीसाठी अंदाजित केलेल्या रक्कमेपेक्षा ३२% जास्त रक्कम परिवहन उपक्रमाला प्राप्त होणार आहे.**

२.७) नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रात बी.ओ.टी. तत्वावर बस निवारा थांबे बांधल्याने प्रवाशांची सोय होणार आहे.

**३.** मा. महापौर, नवी मुंबई महानगरपालिका व आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे अभिप्राय तसेच सदर प्रकरणाची वस्तुस्थिती विचारात घेता परिवहन समितीने दि. ३१.०५.२०१९ रोजी पारीत केलेला ठराव क्र. ११९ हा परिवहन उपक्रमाच्या आर्थिक हिताच्या विरूध्द असल्याचे स्पष्ट होत असल्याने सदर ठराव अंतिमत: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाचा **"नवीन २५० स्टेनलेस स्टील चे बस निवारा थांबे बी.ओ.टी. (बांधा, वापरा, हस्तांतरीत करा) तत्वावर बांधणे व जाहिरातीचे हक्क देण्याबाबतचा"** प्रस्ताव नामंजूर करण्याचा परिवहन समितीने पारित केलेला व दि. १३.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये निलंबित केलेला ठराव क्र. ११९, दि. ३१.०५.२०१९ हा महानगरपालिका परिवहन उपक्रमाच्या आर्थिक हिताच्या विरूध्द असल्याने, शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करून, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे. तसेच परिवहन व्यवस्थापक यांनी परिवहन समितीस सादर केलेल्या प्रस्तावास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००१२११११२१४१२७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff, serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2020.01.21 11:27:39 +05'30'

**( नवनाथ रा. वाठ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. महापौर, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) मा. सभापती, परिवहन समिती, नवी मुंबई महानगरपालिका, जि. ठाणे.
४) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
५) परिवहन व्यवस्थापक, नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रम, जि. ठाणे.
६) प्रधान सचिव ( नवि-२ ) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवडनस्ती ( नवि-२८ ).